श्रीः ।

# नारदभक्तिसूत्राणि ।

खानदेशीयरावेरग्रामस्थपरशुरामभट्टतनयेन

गोविन्दशर्मणा शास्त्रिणा

कृतया महाराष्ट्रभाषाव्याख्यया समलंकृतानि ।




तानि च
मुम्बय्यां
'निर्णयसागर' मुद्रालयाधिपतिना स्वकीये मुद्रालये
मुद्राप्य प्रकाशितानि ।

शकः १८३५, सन १९१३.

मूल्यं रूप्यकषोडशांशः ।




# विज्ञापन.

हें पुस्तक तीर्थरूप वेदमूर्ति श्री १०८ परशुरामभट्ट
यांचे चरणीं अपत्य धर्मपालक गोविंदशास्त्री
यानें भक्तिधर्मस्मरणार्थ समर्पण केलें.

एतद्ग्रंथभाषाकर्ता—

गोविंद परशुरामशास्त्री रावेरकर.




॥ श्रीः ॥

# नारदभक्तिसूत्राणि ।

श्रीगणेशाय नमः । श्रीलक्ष्मीनृसिंहाभ्यां नमः ।
श्रीनारदाय नमः ।

श्रीवेदविद्यागंगायां स्नातं भांतं स्वसंविदा ।
वंदे तं यमुनाकांतं परशूरामनामकम् ॥ १ ॥

ॐनमः परमात्मने सच्चिदानंदायानंदकंदाय वंदारुमंदारायेंदुसुंदरायेंदिरामंदिराय श्रीमन्नृसिंहाय ॥ श्रीः ॥

**अथातो भक्तिं व्याख्यास्यामः ॥ १ ॥**

आतां आह्मी भक्तीचें व्याख्यान करितों ॥ १ ॥

**सा त्वस्मिन्परमप्रेमरूपा ॥ २ ॥**

ती भक्ती तर या प्रभूविषयीं अत्यंत प्रेमस्वरूपिणी आहे २

**अमृतस्वरूपा च ॥ ३ ॥**

आणि ती अमृतस्वरूपिणी आहे ॥ ३ ॥

**यल्लब्ध्वा पुमान्सिद्धो भवत्यमृतो भवति तृप्तो भवति ४**

जें पावून मनुष्य सिद्ध होतो, अमर होतो आणि तृप्त होतो ॥ ४ ॥

**यत्प्राप्य न किंचिद्वांछति न शोचति न द्वेष्टि न रमते नोत्साही भवति ॥ ५ ॥**

जें पावून मनुष्य मग दुसऱ्या कशाची इच्छा करीत नाहीं, शोक करीत नाहीं, द्वेष करीत नाहीं, कोठेंही आसक्त होत नाहीं आणि कोणतीही गोष्ट करण्याचा हव्यास करीत नाहीं ॥ ५ ॥

**यज्ज्ञात्वा मत्तो भवति स्तब्धो भवत्यात्मारामो भवति ६**

जें जाणून उन्माद पावतो, स्तब्ध होतो, आणि आत्म्याच्याच चिंतनामध्यें निमग्न असतो ॥ ६ ॥

**सा न कामयमाना निरोधरूपत्वात् ॥ ७ ॥**

ती भक्ति मनांत कामना धरून होत नाहीं. कारण, ती सर्व कामनांचा अवरोध करणारी आहे ॥ ७ ॥

**निरोधस्तु लोकवेदव्यापारन्यासः ॥ ८ ॥**

शास्त्रप्रतिपादित आणि वेदप्रतिपादित कर्मांचा त्याग करणें, यास निरोध असें ह्मणतात ॥ ८ ॥

**तस्मिन्ननन्यता तद्विरोधिषूदासीनता च ॥ ९ ॥**






आणि त्या भगवंताचेठायीं एकनिष्ठा, व भगवंताच्या विरुद्ध वागणाऱ्यांविषयीं औदासीन्य हींही निरोधाचीं लक्षणें होत ॥ ९ ॥

**अन्याश्रयाणां त्यागोऽनन्यता ॥ १० ॥**

इतर सर्व आश्रय सोडून देऊन ( एका भगवंताच्याच आश्रयानें ) राहणें, यास अनन्यता ( एकनिष्ठा ) असें ह्मणतात ॥ १० ॥

**लोकवेदेषु तदनुकूलाचरणं तद्विरोधिषूदासीनता ॥ ११॥**

आणि शास्त्रें व वेद यांचेठायीं त्यांस विरोध येणार नाहीं अशा रीतीनें वर्तन करणें, आणि शास्त्रें व वेद यांच्या विरुद्ध मतां (पाखंड मतां) विषयीं उदासीन असणें, हेंही एक अनन्यतेचें लक्षण आहे ॥ ११ ॥

**भवतु निश्चयदार्ढ्यादूर्ध्वं शास्त्ररक्षणम् ॥ १२ ॥**

असो, शास्त्रांची मर्यादा बाळगून शास्त्रांचें पालन करावयांचें ह्मटलें तर शास्त्रांत सांगितलेल्या कर्मांवर दृढ विश्वास ठेविल्यावर तें होऊं शकतें ॥ १२ ॥

**अन्यथा पातित्याशंकया ॥ १३ ॥**

जर आपण शास्त्रांवर विश्वास न ठेऊन शास्त्रांविरुद्ध आचरण करण्यास प्रवृत्त झालों तर पतित होऊन जाऊं

कीं काय? अशी शंका मनांत बाळगून शास्त्रांविरुद्ध वर्तन न केलें ह्मणजे अर्थातच शास्त्रांचें पालन घडलें ॥ १३ ॥

**लोकोऽपि तावदेव किंतु भोजनादिव्यापारस्त्वाशरीरधारणावधि ॥ १४ ॥**

लौकिक व्यवहारही तोंपर्यंतच ( दृढ निश्चय होई तोंपर्यंतच ) आहे, परंतु भोजन, आसन, शयन, आदिकरून व्यवहार तर यावत् देहधारण आहे, तोंपर्यंत ( मरणापर्यंत ) लागलेलेच आहेत ॥ १४ ॥

**तल्लक्षणानि वाच्यंते नानामतभेदात् ॥ १५ ॥**

अनेकप्रकारच्या मतभेदेंकरून त्या भक्तीचीं लक्षणें सांगितलीं आहेत ॥ १५ ॥

**पूजादिष्वनुराग इति पाराशर्यः ॥ १६ ॥**

भगवंताच्या पूजनादिकांमध्यें प्रीति असणें, ही भक्ति होय, असें व्यासाचें मत आहे ॥ १६ ॥

**कथादिष्विति गर्गः ॥ १७ ॥**

भगवंताच्या कीर्तन, पुराण, भजन, इत्यादिकांविषयीं प्रीति असणें, ही भक्ति होय असें गर्गाचार्यांचें मत आहे १७

**आत्मरत्यविरोधेनेति शांडिल्यः ॥ १८ ॥**

आत्मचिंतनामध्यें तल्लीन होणें हीच भक्ति होय, असें शांडिल्य ऋषीचें मत आहे ॥ १८ ॥

**नारदस्तु तदर्पिताखिलाचारता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति ॥ १९ ॥**

परंतु नारद ऋषीचें तर असें मत आहे कीं, सर्व कर्में भगवंताला अर्पण करणें, आणि भगवंताचें क्षणमात्र सुद्धां विस्मरण झालें असतां हळहळ करणें, ( पश्चात्ताप करणें ) यास भक्ति असें ह्मणावें ॥ १९ ॥

**अस्त्येवमेवम् ॥ २० ॥**

आणि आहे पण असेंच ॥ २० ॥

**यथा व्रजगोपिकानाम् ॥ २१ ॥**

ज्याप्रमाणें व्रजांतील ( नंदगोकुळांतील ) गोपिकांस [ अशीच ] भक्ति घडली ॥ २१ ॥

**तत्रापि न माहात्म्यज्ञानविस्मृत्यपवादः ॥ २२ ॥**

कारण कीं, त्यांच्या त्या अतिशय प्रेमामध्यें त्या व्रजगोपिकांवर भगवंताचें माहात्म्य विसरून जाण्याचा कधींही अपवाद आला नाहीं ॥ २२ ॥

**तद्विहीनं जाराणामिव ॥ २३ ॥**

कारण कीं, माहात्म्यज्ञान विसरून जाऊन केवळ त्यां-

च्यांत प्रेमच असतें तर तें प्रेम जारांच्या प्रेमासारिखें थोडक्याच काळांत नाश पावलें असतें ॥ २३ ॥

**नास्त्येव तस्मिंस्तत्सुखसुखित्वम् ॥ २४ ॥**

कारण कीं, त्या जारप्रेमामध्यें आपल्या प्रियतमाच्या सुखानें आपण सुखी होणें असें नाहीं. ( तर आपल्या प्रेमाचें सुख आपणच अनुभवणें असें आहे ) ॥ २४ ॥

**सा तु कर्मज्ञानयोगेभ्योऽप्यधिकतरा ॥ २५ ॥**

ती भक्ति तर कर्म, ज्ञान आणि योग यांहूनही फारच श्रेष्ठ आहे ॥ २५ ॥

**फलरूपत्वात् ॥ २६ ॥**

कारण कीं, कर्म ज्ञान व योग हीं साधनें आहेत, आणि भक्ति त्यांचें फल आहे ॥ २६ ॥

**ईश्वरस्याप्यभिमानिद्वेषित्वाद्दैन्यप्रियत्वाच्च ॥ २७ ॥**

कारण कीं, ईश्वराचाही अभिमानी पुरुषांशीं द्वेष करणें आणि दैन्याला प्रिय करणें असा स्वभावच आहे ॥ २७ ॥

**तस्या ज्ञानमेव साधनमित्येके ॥ २८ ॥**

त्या भक्तीचें ज्ञानच काय तें एक साधन आहें, असें कित्येक आचार्यांचें ह्मणणें आहे ॥ २८ ॥

**अन्योन्याश्रयत्वमित्यन्ये ॥ २९ ॥**

ज्ञान व भक्ति यांचा परस्पर एकमेकांशीं एकमेकांचा आश्रय आहे, असें इतर आचार्यांचें मत आहे ॥ २९ ॥

**स्वयं फलरूपतेति ब्रह्मकुमारः ॥ ३० ॥**

परंतु नारद ऋषीचें मत तर असें आहे कीं, भक्ति स्वतःच फलरूपिणी आहे ॥ ३० ॥

**राजगृहभोजनादिषु तथैव दृष्टत्वात् ॥ ३१ ॥**

राजगृहांत व भोजनादिक व्यवहारांत तसेंच दिसून येतें ह्मणून ॥ ३१ ॥

**न तेन राजपरितोषः क्षुच्छांतिर्वा ॥ ३२ ॥**

कारण कीं, केवळ "राजा फार चांगला आहे" अशा ज्ञानमात्रेंकरूनच आपल्यावर राजाची प्रीति जडते असें नाहीं, आणि केवळ भोजनांतील पदार्थांच्या ज्ञानमात्रें-करूनच क्षुधा शांत होते असें नाहीं. ( तर राजाच्या से-वनेंकरूनच राजा संतुष्ट होतो, व भोज्य पदार्थांची स्वयंपा-कादि खटपट केल्यानेंच क्षुधा शांत होते ॥ ३२ ॥

**तस्मात्सैव ग्राह्या मुमुक्षुभिः ॥ ३३ ॥**

यास्तव, मुक्त होऊं इच्छिणारांनीं केवळ ती एकटी भक्तीच घ्यावी ॥ ३३ ॥

**तस्याः साधनानि गायंत्याचार्याः ॥ ३४ ॥**

आचार्य जन त्या भक्तीचीं अनेक प्रकारचीं साधनें सांगतात ॥ ३४ ॥

**तत्तु विषयत्यागात्संगत्यागाच्च ॥ ३५ ॥**

परंतु तें भक्तिरूपी फळ तर विषयांच्या परित्यागानें व संगतीच्या परित्यागानें सिद्ध होतें ॥ ३५ ॥

**अव्यावृतभजनात् ॥ ३६ ॥**

आणि निरंतर भजनाच्या योगानें ती (भक्ति) प्राप्त होते॥

**लोकेऽपि भगवद्गुणश्रवणकीर्तनात् ॥ ३७ ॥**

लोकांत सुद्धां भगवंताच्या गुणांच्या ऐकण्यानें व वर्णणानें ती प्राप्त होते ॥ ३७ ॥

**मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद्वा ॥ ३८ ॥**

परंतु मुख्य साधन ह्मटलें तर महात्मे लोकांच्या कृपेनें किंवा भगवंताच्या कृपेच्या लेशमात्रेंकरूनच ती भक्ति प्राप्त होते ॥ ३८ ॥

**महत्संगस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च ॥ ३९ ॥**

महात्मे लोकांचा समागम होणें तर दुर्लभ आहे. कारण कीं, तो सत्समागम आपण करूं असें ह्मणून कांहीं घडत नाहीं, आणि जर घडला तर तो कधींही नि-

ष्फळ व्हावयाचा नाहीं ( अर्थात् सत्समागमाचें फळ आहेच आहे ) ॥ ३९ ॥

**लभ्यतेऽपि तत्कृपयैव ॥ ४० ॥**

पण तो सत्समागमही त्या प्रभूच्या कृपेनेंच प्राप्त होतो ॥

**तस्मिंस्तज्जने भेदाभावात् ॥ ४१ ॥**

कारण कीं, भगवान् व त्याचे भक्त यांत कांहींही भेद नाहीं ह्मणून ॥ ४१ ॥

**तदेव साध्यतां तदेव साध्यताम् ॥ ४२ ॥**

ह्मणून तो सत्समागमच साधा, तो सत्समागमच साधा ॥

**दुःसंगः सर्वथैव त्याज्यः ॥ ४३ ॥**

दुर्जनांशीं समागम अगदीं सोडून द्यावा ॥ ४३ ॥

**कामक्रोधमोहस्मृतिभ्रंशबुद्धिनाशसर्वनाशकारणत्वात्**

कारण कीं, तो दुर्जनसमागम काम, क्रोध, मोह, भ्रमिष्ठपणा, निर्बुद्धित्व आणि सर्वस्वीं नाश यांचें मूलकारण आहे ह्मणून ॥ ४४ ॥

**तरंगायिता अपीमे संगात्समुद्रायंति ॥ ४५ ॥**

कारण कीं, हे कामक्रोधादि दुर्गुण तरंगांसारखे अल्प-

स्वल्प जरी आहेत, तथापि ते दुर्जनसमागमाच्या महिम्यानें समुद्रासारखे अफाट ( दुस्तर ) होतात ॥ ४५ ॥

**कस्तरति कस्तरति मायां यः संगांस्त्यजति यो महानुभावं सेवते निर्ममो भवति ॥ ४६ ॥**

मायेला कोण तरतो, कोण तरतो ? जो सकल संगपरित्याग करितो, महाप्रभाव प्रभूची उपासना करितो [महात्म्या पुरुषांची सेवा करितो ] आणि जो मोह सोडून देतो ॥ ४६

**यो विविक्तस्थानं सेवते यो लोकबंधमुन्मूलयति निस्त्रैगुण्यो भवति यो योगक्षेमं त्यजति ॥ ४७ ॥**

जो एकांत स्थानांत रहातो, जो लोकांचीं बंधनें नाहींशीं करितो, जो सत्व, रज आणि तम या गुणांपासून मुक्त होतो, आणि जो खाणें, पिणें, नेसणें, पांघरणें, मिळविणें हीं सोडून देतो ॥ ४७ ॥

**यः कर्मफलं त्यजति कर्माणि संन्यसति ततो निर्द्वंद्वो भवति ॥ ४८ ॥**

जो कर्मांचीं फळें सोडून देतो, जो कर्मेंही सोडून देतो, मग समस्वभाव ( शत्रुत्वमित्रत्वभावरहित ) होतो ॥ ४८ ॥

**वेदानपि संन्यसति केवलमविच्छिन्नानुरागं लभते ४९**

वेदांचा सुद्धां त्याग करितो, तेव्हां केवळ शुद्ध पूर्ण ( प्रभूचा ) प्रसाद पावतो ॥ ४९ ॥

**स तरति स तरति स लोकांस्तारयति ॥ ५० ॥**

तो तरतो, तो तरतो, आणि तो लोकांसही तारितो ५०

**अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम् ॥ ५१ ॥**

प्रेमाचें स्वरूप सांगितलें जात नाहीं ॥ ५१ ॥

**मूकास्वादनवत् ॥ ५२ ॥**

ज्याप्रमाणें मुक्याला ( एखादा चांगला गोड पदार्थ देऊन तो कसा लागतो ह्मणून विचारल्यास ) सांगतां येत नाहीं तसा ॥ ५२ ॥

**प्रकाश्यते क्वापि पात्रे ॥ ५३ ॥**

परंतु प्रेमपात्र ( भक्तिप्रिय ) मिळाल्यास कोठें कोठें ( महात्मेलोकांकडून ) तें प्रेमस्वरूप प्रकाशित केलें जातें ॥

**गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षणवर्धमानमविच्छिन्नं सूक्ष्मतरमनुभवरूपम् ॥ ५४ ॥**

तें प्रेम सत्व, रज आणि तम या गुणांनीं रहित, इच्छांनीं रहित, व क्षणोक्षणीं वाढणारें, परिपूर्ण, अत्यंत सूक्ष्म, आणि केवळ अनुभवस्वरूप असतें ॥ ५४ ॥

**तत्प्राप्य तदेवावलोकयति तदेव शृणोति तदेव चिंतयति ॥ ५५ ॥**

प्रेम पावून तें प्रेमच पाहतो, आणि तेंच ऐकतो, व त्याचेंच निरंतर चिंतन करितो ॥ ५५ ॥

**गौणी त्रिधा गुणभेदादार्तादिभेदाद्वा ॥ ५६ ॥**

गौणभक्ति आर्त, जिज्ञासु, व अर्थार्थी, या भेदांनीं अथवा, सत्व, रजं, तम, या भेदांनीं तीन प्रकारची [ भगवद्गीतेंत सांगितली ] आहे ॥ ५६ ॥

**उत्तरस्मादुत्तरस्मात्पूर्वपूर्वा श्रेयाय भवति ॥ ५७ ॥**

पुढल्या पुढल्या भक्तीपेक्षां पूर्वपूर्व भक्ति श्रेयस्कर होय ह्मणजे–अर्थार्थीकृत भक्तीपेक्षां ( पक्षीं ) तामसभक्तीपेक्षां जिज्ञासुकृत भक्ति ( पक्षीं ) राजसभक्ति श्रेयस्कर जिज्ञासुकृत भक्तीपेक्षां ( पक्षीं ) राजसभक्तिपेक्षां आर्तकृत भक्ति ( पक्षीं ) सात्विकी भक्ति श्रेयस्कर होय ॥ ५७ ॥

**अन्यस्मात्सौलभ्यं भक्तौ ॥ ५८ ॥**

ईश्वराची प्राप्ति होण्याच्या इतर साधनांपेक्षां भक्ति हें साधन अगदीं सुलभ आहे ॥ ५८ ॥

**प्रमाणान्तरस्यानपेक्ष्यत्वात्स्वयंप्रमाणत्वात् ॥ ५९ ॥**

कारण कीं, भक्ति ह्मणजे काय व कशी करावी ह्या-

विषयीं दुसऱ्या प्रमाणाची कांहींएक अपेक्षा लागत नाहीं, व दुसरें ही, भक्ति स्वतःच प्रमाणीभूत आहे ॥ ५९ ॥

**शान्तिरूपात्परमानन्दरूपाच्च ॥ ६० ॥**

कारण कीं, प्रत्यक्ष असें पहा कीं, ह्या भक्तीपासून लागलीच शांति प्राप्त होते, व परमानंदही प्राप्त होतो [ तर हें भक्तीचें प्रत्यक्ष प्रमाण नव्हे कां ? ] ॥ ६० ॥

**लोकहानौ चिन्ता न कार्या निवेदितात्मलोकवेदत्वात् ॥ ६१ ॥**

लोकांचा नाश होत आहे हें पाहून चिंता व खेद करीत त्या विवंचनेमध्यें निमग्न होऊं नये. कारण कीं, भगवच्चिंतनीं लीन झालेल्या व प्रेमी पुरुषांचा धर्म तर असा आहे कीं, त्यांनीं आपला देह, सर्व लोक, आणि वेदसुद्धां ईश्वराचेठायीं समर्पण केले असले पाहिजेत ॥ ६१ ॥

**न तदसिद्धौ लोकव्यवहारो हेयः किंतु फलत्यागस्तत्साधनं च कार्यमेव ॥ ६२ ॥**

तर जोंपर्यंत भगवंताचेठायीं तन्मयता झाली नाहीं, व एकाग्र प्रेम जडलें नाहीं, तोंपर्यंत लोकांत चालत आलेला व्यवहार सोडूंच नये. तर जें कर्म करावयाचें तें निष्काम करावें, आणि भगवदेकनिष्ठता व प्रेम प्राप्त होण्याचीं साधनें करीतच असावें ॥ ६२ ॥

**स्त्रीधननास्तिकचरित्रं न श्रवणीयम् ॥ ६३ ॥**

स्त्रिया, धन व धर्माची निंदा करणारा, यांचें चरित्र ऐकूं नये. [कारण कीं त्यापासूनच चित्तव्याक्षेप होतो] ६३

**अभिमानदंभादिकं त्याज्यम् ॥ ६४ ॥**

अहंकार व ढोंग सोडून द्यावें ॥ ६४ ॥

**तदर्पिताखिलाचारः सन्कामक्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम् ॥ ६५ ॥**

आणि आपलीं सर्व कर्में त्याला समर्पण करावीं. व काम, क्रोध, अभिमान आदिक कांहींही करावयाचें असल्यास त्याविषयींच करावें ॥ ६५ ॥

**त्रिरूपभंगपूर्वकं नित्यदास्यनित्यकान्ताभजनात्मकं प्रेम कार्यं प्रेमैव कार्यम् ॥ ६६ ॥**

प्रेम, प्रेमी आणि प्रेम करण्यास योग्य कांहीं नाहीं असा समज सोडून देऊन या भगवंताचें अनेक स्त्रियांचें सेवन करण्याविषयींचें प्रेम, गोपिकादिक स्त्रिया प्रेमपात्र व भगवान् प्रेमी असें ध्यान करूनच तेंच प्रेम निरंतर आपण भगवंताविषयीं करावें ॥ ६६ ॥

**भक्ता एकांतिनो मुख्याः ॥ ६७ ॥**

भगवंताचेठायीं तल्लीन झालेलेच भक्त मुख्य होत ॥ ६७ ॥

**कंठावरोधरोमांचाश्रुभिः परस्परं लपमानाः पावयंति कुलानि पृथिवीं च ॥ ६८ ॥**

कीं, जे परस्पर भगवंताविषयींच्या गोष्टी प्रेमानें गद्गद-कंठ दाटून अंगावर रोमांच उभारून नेत्रांतून हर्षाश्रु-धारा सोडून सांगतात, ते आपल्या कुलांस उद्धरतात. आणि पृथ्वीला पवित्र करितात ॥ ६८ ॥

**तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि सुकर्मीकुर्वंति कर्माणि सच्छास्त्रीकुर्वन्ति शास्त्राणि ॥ ६९ ॥**

ते तीर्थांना सुद्धां पवित्र करतात, ते कर्मांनां पुण्यें करितात आणि शास्त्रांनां सुशास्त्रें ह्मणजे लोकमान्य शास्त्रें करितात ॥ ६९ ॥

**तन्मयाः ॥ ७० ॥**

कारण कीं, ते भक्त भगवत्स्वरूपच आहेत. ( मग ते काय करूं शकणार नाहींत ? ) ॥ ७० ॥

**मोदन्ते पितरो नृत्यन्ति देवताः सनाथा चेयं भूर्भवति ॥**

पहा, कीं ज्या भक्तजनांच्या जन्ममात्रेंकरून पितर आनंद पावतात. देव, गंधर्व, अप्सरा नृत्य करितात आणि ही पृथ्वीही चांगल्या राजानें युक्त होते ॥ ७१ ॥

**नास्ति तेषु जातिविद्यारूपकुलधनक्रियादिभेदः ७२**

त्या भक्तजनांमध्यें जाति, कुल, विद्या, सौंदर्य, वंश, द्रव्य, आणि क्रिया यांचा [इतरजनांसारखा] कोणत्याही तऱ्हेचा भेद नाहीं ॥ ७२ ॥

**यतस्तदीयाः ॥ ७३ ॥**

कारण कीं, तेसर्व भक्तजन त्या भगवंताचे आहेत. [भगवंतास कशांतच भेद नाहीं] ॥ ७३ ॥

**वादो नावलम्ब्यः ॥ ७४ ॥**

वादाचें अवलंबन करूं नये. तार्किकपणा व दुराग्रह स्वीकारूं नये ) ॥ ७४ ॥

**बाहुल्यावकाशत्वादनियतत्वात् ॥ ७५ ॥**

कारण कीं, वादामध्यें पुष्कळ ठिकाणीं चित्तास भटकण्यास अवकाश असतो आणि वादामध्यें निश्चय करून पाहिलें असतां सार कांहीच नाहीं ॥ ७५ ॥

**भक्तिशास्त्राणि मननीयानि तदुद्बोधककर्माणि करणीयानि ॥ ७६ ॥**

ज्यांमध्यें भक्तीचें उपपादन केलें आहे अशा शास्त्राचें चिंतन करावें आणि भक्तिवर्धक व भक्तिशास्त्रीयज्ञानबोधक कर्में करावीं ॥ ७६ ॥

**सुखदुःखेच्छालाभादित्यक्ते काले प्रतीक्षमाणे क्षणार्धमपि व्यर्थं न नेयम् ॥ ७७ ॥**

ज्या काळीं सुख, दुःख, इच्छा, लाभ, इत्यादिक अनेक तऱ्हेच्या विषयांचें व्यवधान नसतें असा हा कलाकाष्ठानिमेषादिपरिच्छिन्न काल मनुष्याची परीक्षा करीत (याचें आयुर्मान इतकें उरलें आहे तर तें आतां पूर्ण करीन, व इतका मी पुढें गेलों ह्मणजे ह्या प्राण्याच्या ऋणापासून मुक्त होईन अशी प्रतीक्षा करीत ) असतां आपलें हित साधणाऱ्या पुरुषानें अर्धा क्षणसुद्धां वेळ व्यर्थ नेऊं नये ॥ ७७ ॥

**अहिंसासत्यशौचदयास्तिक्यतादिचारित्राणि परिपालनीयानि ॥ ७८ ॥**

आणि अहिंसा, ( हिंसा न करणें ) सत्यता, ( पवित्रता ) दया, आस्तिकता ( परलोक व नरकादिक आहेत असें मानणें ) आदिकरून जीं सुवर्तनें आहेत तीं पालन करावीं ७८

**सर्वदा सर्वभावेन निश्चिन्तितैर्भगवानेव भजनीयः ॥७९॥**

आणि सदा सर्वदा कायावाचामनेंकरून निश्चित होऊन भगवंताचेंच भजन करावें ॥ ७९ ॥

**स कीर्त्यमानः शीघ्रमेवाविर्भवत्यनुभावयति भक्तान्॥८०॥**

कारण कीं, तो भगवान् कीर्तन करण्यानें लवकरच प्रगट होऊन आपल्या भक्तांस प्रेमानंदानें अनुभवी करितो ॥८०॥

**त्रिसत्यस्य भक्तिरेव गरीयसी भक्तिरेव गरीयसी ॥ ८१॥**

भूत, भविष्य आणि वर्तमान या तिन्हींही कालांत अविच्छिन्न परिपूर्ण यथास्थित रहाणाऱ्या सच्चिदानंद अशा भगवंताची भक्तीच श्रेष्ठ आहे भक्तीच श्रेष्ठ आहे ॥ ८१ ॥

गुणमाहात्म्यासक्तिरूपासक्तिपूजासक्तिस्मरणासक्ति-
दास्यासक्तिसख्यासक्तिवात्सल्यासक्तिकान्तास-
क्त्यात्मनिवेदनासक्तितन्मयतासक्तिपरमविरहास-
क्तिरूपैकधाप्येकादशधा भवति ॥ ८२ ॥

ती भक्ति एक प्रकारची आहे खरी, तथापि भगवंताचे गुण, चरित्रें, माहात्म्यें, ऐकण्याची प्रीति, स्वरूप पहाण्याचीच प्रीति, पूजेविषयीं प्रीति, स्मरणामध्यें प्रीति, सेवाचाकरी करण्याची प्रीति, मित्रभाव ठेवण्याची प्रीति, वात्सल्य ( वल्लभता ) ठेवण्याची आवड, स्त्रीभाव आपलेठायीं ठेऊन सेवा करण्याची आवड, सर्वस्व भगवंतास समर्पण करण्याची प्रीति, भगवत्स्वरूपीं तल्लीन होण्याची प्रीति आणि अत्यंत विरह होऊन जसा ममतेचा झरा फुटतो त्याप्रमाणें भगवंताचे ठायीं प्रीति करणें, या अवांतर भेदानीं अकरा प्रकारची होते ॥ ८२ ॥

इत्येवं वदन्ति जनजल्पनिर्भया एकमताः कुमारव्या-
सशुकशाण्डिल्यगर्गविष्णुकौण्डिन्यशेषोद्धवारुणि-
बलिहनुमद्विभीषणादयो भक्त्याचार्याः ॥ ८३ ॥

लोकाच्या कुत्सित भाषणाला न भिणारे व एकमतवादि कुमार, व्यास, शुक, शांडिल्य, गर्ग, विष्णु, (वैकुंठवासी) कौंडिन्य, शेष, उद्धव, आरुणी, बलि, हनुमान् आणि बिभीषण आदिकरून जे भक्तीचे आचार्य ते असेंच ह्मणतात ८३

**य इदंनारदप्रोक्तं शिवानुशासनं विश्वसिति श्रद्धत्ते स भक्तिमान्भवति स श्रेष्ठं लभते स श्रेष्ठं लभते इति ॥८४**

जो मनुष्य नारदानें सांगितलेल्या ह्या शंकराच्या अनुशासना (मता) वर विश्वास ठेवतो आणि श्रद्धा करितो (त्याप्रमाणें आचरण करितो) तो मनुष्य भक्तिमान् होऊन आपणास इच्छित मनोरथ पावतो, आणि सर्वांस अत्यंत प्रिय जो भगवान् त्याप्रत पावतो ॥ ८४ ॥ नमो नृसिंहाय ॥

शाके कन्याश्रवसुभूमिते चैत्रे सितेतरे ॥ परशूधरपुत्रेण कृता भाषाह्नि पञ्चमे ॥ १ ॥ श्रीरस्तु । शुभंभवतु । श्रीलक्ष्मीनृसिंहः प्रसीदतु ॥



